राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळ, नवी दिल्ली यांना सन २०१९-२० पर्यंतची कर्जाची व्याजासह परतफेड सन २०२०-२१ च्या मंजूर अनुदानातून करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
शासन निर्णय क्रमांक रासविम-३०२०/ प्र.क्र.१८/ टेक्स-१(ब)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १७ सप्टेंबर, २०२०.

संदर्भ :- १) उप निदेशक (वित्त), रा.स.वि.म., नवी दिल्ली यांचे पत्र क्र. NCDC-A&C/ IX (१)/Rep/०९/१८००, दि. १९.६.२०२०.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि. १०.५.२०१६.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल, २०२०
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ४ मे, २०२०

प्रस्तावना :-

वस्त्रोद्योग विभागांतर्फे राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळ, नवी दिल्ली यांच्या विविध योजनांतर्गत राज्यातील विविध वस्त्रोद्योग घटकांना त्या त्या योजनेच्या मंजूर आकृतीबंधानुसार भागभांडवल / कर्ज / अनुदान स्वरुपात अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्यात येते. रा.स.वि.म. कडून राज्य शासनास उपलब्ध करुन देण्यात येणारा निधी हा राज्य शासनावर संपूर्णपणे कर्ज म्हणून गणला जातो. संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये रा.स.वि.म. ने राज्य शासनास मंजूर केलेल्या कर्जापैकी सन २०१९-२० च्या देय हप्त्यापोटी परतफेडीकरीता पात्र ठरलेल्या कर्जातील मुद्दल रु. १,६२,६६,०००/-व व्याज रु.५५,०२,३३९/- अशा एकूण रु.२,१७,६८,३३९/- इतक्या रकमेची परतफेड करण्याबाबत कळविण्यात आले आहे. सदर पत्रात कळविल्यानुसार सदर रक्कम दि.२०.९.२०२० पूर्वी भरल्यास व्याजाच्या रकमेत सूट मिळणार असून रु.५५,०२,३३९/- ऐवजी रु. ५१,०७,७९२/- इतकी रक्कम भरावी लागेल. म्हणजेच दि.२०.९.२०२० पूर्वी रक्कम भरल्यास शासनास रु. ३,९४,५४७/- इतकी सूट मिळून एकूण रु.२,१३,७३,७९२/- इतकी रक्कम भरावी लागेल. सबब, रु.२,१३,७३,७९२/- (कर्जाची रक्कम रु.१,६२,६६,०००/- + व्याज रु.५१,०७,७९२/- ) इतकी रक्कम रा.स.वि.म., नवी दिल्ली यांना अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राज्यातील विविध वस्त्रोद्योग घटकांना राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळ, नवी दिल्ली यांच्या विविध योजनांतर्गत राज्य शासनास कर्ज मंजूर करण्यात आले होते. सदर कर्जाची मुद्दल रु. १,६२,६६,०००/- व त्यावरील व्याज रु.५१,०७,७९२/- अशी एकूण रु.२,१३,७३,७९२/- (अक्षरी रु. दोन कोटी तेरा लाख त्र्याहत्तर हजार सातशे ब्याण्णव फक्त) इतकी रक्कम सन २०१९-२० पर्यंतच्या परतफेडीच्या हप्त्यापोटी राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळ, नवी दिल्ली यांना अदा करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूर देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, परिपत्रक क्र. अर्थसं २०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक ४.५.२०२० अनिवार्य खर्च या शीर्षातील अ.क्र.६) नुसार सदर अनिवार्य खर्च हा भारित खर्च असल्यामुळे त्यास खर्चाची मर्यादा लागू नाही. तसेच अ.क्र.७) मध्ये नमूद केल्यानुसार शासन परिपत्रक, वित्त विभाग दि. १६.४.२०२० नुसार "४५-व्याज" या उद्दीष्टामध्ये सदरहू खर्च येत असून त्यास वित्त विभागाची अनुमती घेण्यात आली आहे. तसेच अ.क्र.८) नुसार अनुदानामध्ये बचत होण्याच्या दृष्टीने विभागाने आवश्यक त्या उपाययोजना केल्या आहेत.

उपरोक्त शासन निर्णयातील अ.क्र. १) ते ५ व ९) ते १२) सदर प्रकरणी लागू नाहीत.

तसेच सदर शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.८ नुसार सदर खर्चास वित्त विभागाची सहमती घेण्यात आली आहे.

३. कोषागारात देयके पारित करताना घ्यावयाची दक्षता या बाबतच्या वित्त विभागाच्या दि. १०.५.२०१६ च्या परिपत्रकाच्या अनुषंगाने सदर प्रस्तावासंबंधी माहिती खालीलप्रमाणे आहे -

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार - शा.नि. , वित्त विभाग, दि. ४ मे, २०२० मधील "अनिवार्य खर्च" या शीर्षाखाली अ.क्र.७) प्रमाणे ०१-वेतन, ०४- निवृत्ती वेतन ३६- सहायक अनुदान (वेतन) इ. उद्दीष्टांव्यतिरिक्त इतर बाबींवर खर्च करण्यापूर्वी वित्त विभागाची अनुमती घेणे आवश्यक आहे. रा.स.वि.म. च्या कर्ज व व्याजाच्या वार्षिक हप्त्याची परतफेड हा खर्च अनुक्रमे ५६ - कर्जाची परतफेड व ४५- व्याज या अनिवार्य खर्चात मोडतो.

२) मंजूर निधी :- सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात “रा.स.वि.म.कडून मिळालेली कर्जे (वस्त्रोद्योग) (अनिवार्य) (६००३ ०४६७)”या लेखाशीर्षाखाली रु.५,२२,००,०००/-इतकी तरतूद अर्थसंकल्पित असून "रा.स.वि.म.कडून मिळणा-या कर्जावरील व्याज (वस्त्रोद्योग) (अनिवार्य) (२०४९ २७२९)" या लेखाशीर्षाखाली रु.१,४४,००,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पित आहे.

३) मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५%किंवा अधिक निधी खर्च झाला आहे:- मागील ३ महिन्यांपूर्वी उपरोक्त दोन्ही लेखाशीर्षांतर्गत कोणताही खर्च झालेला नाही.

४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यांत येत आहे, त्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही:-उपरोक्त दोन्ही लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

सदर शासन निर्णयातील अ. क्र.५ ते १० येथील बाबी लागू नाहीत.

४. सदर खर्च खालील लेखाशीर्षासाठी सन २०२०-२१ मध्ये करण्यात आलेल्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून भागविण्यात यावा.

१) कर्ज :- रु. १,६२,६६,०००/-

**मागणी क्र. व्ही -४**

६००३, राज्य शासनाचे देशांतर्गत ऋण

(००) १०८- राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून मिळालेली कर्जे

(००)(०३) राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून मिळालेली कर्जे

(वस्त्रोद्योग)(अनिवार्य)

भारित, ५६- कर्जाची परतफेड (६००३ ०४६७)

२) व्याज :-रु. ५१,०७,७९२/-

**मागणी क्रमांक व्ही-१**

२०४९ , व्याज प्रदाने

(०१)- देशांतर्गत ऋणांवरील व्याज

(२००) देशांतर्गत इतर ऋणावरील व्याज

(०२) कर्जावरील व्याज, भारित

(०२) (०८) राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून मिळणा-या कर्जावरील व्याज

(वस्त्रोद्योग) (अनिवार्य)

भारित ४५- व्याज (२०४९ २७२९)

५. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली रु. २,१३,७३,७९२/- (अक्षरी रु. दोन कोटी तेरा लाख त्र्याहत्तर हजार सातशे ब्याण्णव फक्त) इतकी रक्कम राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळ, नवी दिल्ली (NATIONAL COOPERATIVE DEVELOPMENT CORPORATION, NEW DELHI) या नावाने अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरीत करुन राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाच्या स्टेट बँक ऑफ इंडिया, व्यावसायिक शाखा, नेहरु प्लेस, नवी दिल्ली, चालू खाते क्र.३२१६४०५२८७४ मध्ये RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करण्याकरीता श्री. र. गं. बोड्डू, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२ यांना "आहरण व संवितरण अधिकारी"म्हणून तसेच श्री. विशाल मदने, उप सचिव (सूतगिरणी), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२ यांना "नियंत्रण अधिकारी"म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यानुसार त्यांनी रा.स.वि.म., नवी दिल्ली यांना उपरोक्त रक्कम RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करावी. बँकेचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| खात्याचे नाव | बँकेचे नाव व शाखा | चालू खाते क्रमांक | आय.एफ.एस.सी. क्रमांक |
|---|---|---|---|
| National Cooperative Development Corporation | State Bank of India Commercial Branch, Nehru Place, New Delhi | 32164052874 | SBIN0004298 |

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२६९/२०२०, व्यय-२, दि. १७.९.२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९१७१६०९११६५०२ असाआहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Vishal Vishvas Madane

Digitally signed by Vishal Vishvas Madane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co Operation Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d9428966ce3233edb83a20c38834c19f2e3793, serialNumber=cb16db1cc002e115b709a8ca348a6483883493aaf53b7be25836cda1b57ff2dc, cn=Vishal Vishvas Madane
Date: 2020.09.18 11:51:06 +05'30'

**( विशाल मदने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
२) महालेखापाल, (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
३) सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) कार्यासन अधिकारी (रोखशाखा) (२प्रतींसह),सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई
५) अवर सचिव,१७-स/कार्यासन अधिकारी,१६-स,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई ३२
६) वित्त विभाग, कार्यासन व्यय-२ / अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) उप निदेशक (वित्त), राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळ, ४- सिरी इन्स्टीटयुशनल एरिया, हौझ खस, नवी दिल्ली - ११० ०१६.
८) आयुक्त वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
११) शाखा व्यवस्थापक, स्टेट बँक ऑफ इंडिया, कमर्शिअल ब्रँच, नेहरु प्लेस, नवी दिल्ली.
१२) निवडनस्ती (टेक्स १- ब / टेक्स-१-अ)